**भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदांच्या भरतीसाठी निवड समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- पदभ-२०२२/प्र.क्र.१९२/उद्योग-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ मार्च, २०२३

**वाचा :-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.समिती २०११/ प्र.क्र.१४३ /११/उ-४, दिनांक ३१ मार्च, २०१२.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.५४/का.१३-अ, दिनांक ०४ मे, २०२२.
३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. प्रानिमं-१२२२/प्र.क्र.१३६/का.१३-अ, दिनांक २१ नोव्हेंबर, २०२२.
४) संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांचे पत्र आस्था/भरती/गट-क/कार्या-४अ-३/७५५७/२०२२-२३,दि.१५.०२.२०२३.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयाच्या अनुषंगाने, संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील गट-क संवर्गातील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील पदे वगळून) प्रादेशिक व राज्यस्तरीय पदे सरळसेवा प्रवेशाने भरण्यासाठी निवड समित्यांची स्थापना करण्यास शासनाची मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्याबाबत एकत्रित मार्गदर्शक सूचना विहित करण्यात आलेल्या असून तसेच संदर्भ क्र.०३ येथील शासन निर्णयान्वये नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड संवर्गातील पदे सरळसेवेने, स्पर्धा परिक्षा प्रक्रियेद्वारे भरण्यासाठी TCS (Tata Consultancy Pvt Ltd) व IBPS (Institute of Banking Personnel Selection) या कंपनीमार्फत भरती प्रक्रिया राबविण्यास शासन मान्यता प्राप्त झाली आहे.

३. संदर्भ क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनान्वये राज्यस्तरीय पदे भरण्याकरिता राज्यस्तरीय निवड समित्यांची रचना अद्ययावत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई या संचालनालयाच्या आस्थापनेवरील आणि संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालये, शासकीय ग्रंथागारे आणि शासकीय लेखनसामग्री भांडारे यांच्या आस्थापनेवरील भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील नामनिर्देशन कोट्यातील सरळसेवेच्या पदांची भरती प्रक्रिया करण्यासाठी राज्यस्तरीय निवड समितीची स्थापना करण्यात येत असून, सदर समितीची रचना पुढीलप्रमाणे राहील.

**राज्यस्तरीय निवड समितीची रचना:-**

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | उप संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ३ | व्यवस्थापक (संबंधित मुद्रणालय) | सदस्य |
| ४ | मागासवर्गीय प्रतिनिधी, गट-अ/गट-ब राजपत्रित | सदस्य |
| ५ | अल्पसंख्यांक प्रतिनिधी, गट-अ/गट-ब राजपत्रित | सदस्य |
| ६ | आस्थापना अधिकारी, गट-ब राजपत्रित | सदस्य सचिव |
| **टिप:-** सर्वसाधारण किंवा उपरोक्त प्रवर्गापैकी कोणत्याही प्रवर्गामधील एक प्रतिनिधी महिला असणे आवश्यक आहे. | | |

**समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-**

अ) शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील तसेच संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय मुद्रणालये, शासकीय ग्रंथागारे आणि शासकीय लेखनसामग्री भांडारे यांच्या आस्थापनेवरील भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील पदे भरण्यासाठी उमेदवारांची निवड करण्याची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक २ व ३ येथे नमुद शासन निर्णयातील तरतूदी तसेच या संदर्भात शासनाने वेळोवेळी दिलेल्या आदेशांशी सुसंगत ठेवणे अनिवार्य राहील.

ब) सदर समितीने विचाराधिन सरळसेवा कोट्यातील पदे भरण्याची कार्यवाही सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून दोन महिन्यात पुर्ण करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२४१४३०५११३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df4410 63695f377819, pseudonym=3A3CA4E4F15E12F04BF0F70BCA1F3C39DEE206CB, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A 87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2023.03.24 14:35:50 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, मुंबई.

२. सर्व व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालये (संचालनालयामार्फत)

३. सर्व सहायक संचालक, शासकीय लेखनसामग्री भांडारे व ग्रंथागारे (संचालनालयामार्फत)

४. निवड नस्ती (उद्योग-४).